# बिचारा

जैनेंद्र कुमार

अनुवाद

हेमा जावडेकर



*नवसाक्षर साहित्यमाला*

# बिचारा

**जैनेंद्र कुमार**

अनुवाद

**हेमा जावडेकर**




**नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया**

# बिचारा

एका घनदाट अरण्यात एक नाग राहत होता. तो अगदी अक्राळविक्राळ होता. पण दिसायला अतिशय सुंदर होता. जंगलातील इतर प्राण्यांना त्याची भीती वाटत असे. तसेच, त्याच्याबाबत एक आकर्षणही वाटत असे. त्याच्या काळ्याभोर देहावर जणू नक्षीकाम केले होते. अन् फणीवर जणू रत्ने जडविलेली होती. हा विषारी नाग होता, पण तो मनाने फार चांगला होता. तो रागाने फणफणला की





त्याच्या उष्ण उच्छ्वासाने आसपासचे गवतसुद्धा जळून जात असे. एरवी तो आपल्या जागेवर निमूट पडून राहत असे. अशावेळी किडे मुंग्याही अगदी सहजपणे त्याच्या शरीराशी खेळत असत.



एके दिवशी अचानक त्या वनात एक देवलोकातील बालक खेळत खेळत येऊन पोहोचले. ते आनंदाने हसत-खिदळत होते. त्याच्या मनात आनंदाचे कारंजे थुईथुई नाचत होते. त्याला भीती माहीत नव्हती. बालक इतके सुंदर होते की काय सांगावे! त्याच्या

हातात बासरी होती. ती गरगर फिरवीत ते चालले होते. या घनघोर वनात हे बालक कोठून येऊन टपकले देव जाणे.

बालकाचे मन खेळात रमले होते. खेळता खेळता त्याचा पाय नागाच्या शेपटीवर पडला. तसा लगेच नागाने फणा काढला. आणि त्या बालकाच्या पायाला तो कडकडून डसला.



त्या नागाच्या विषाचा प्रभावच असा होता की बघता बघता ते बालक तेथेच धाडकन् कोसळले. डोळा लवतो न लवतो तोच त्याचे शरीर थंडगार पडले. विव्हळण्याचा स्वरही मुखातून बाहेर पडला नाही. जणू हसता खेळता ते खाली कोसळले की काय! त्याचे तोंड मुळीच वाकडे तिकडे झाले नव्हते.

कोसळलेल्या बालकाला नागाने पाहिले. त्याला खूप वाईट



वाटले. बालकाचे रूप पाहून नाग अगदी मोहित झाला. त्या बालकाच्या चेहऱ्यावर सापाविषयी कसलीही दुर्भावना नव्हती किंवा तक्रारीचा मागमूसही दिसला नव्हता. नागाला मनोमन खूप वाईट वाटले. तो बालकाभोवती वेटोळे घालून पहारा देऊ लागला.

दिवस मावळला, रात्रही सरली, असे दोन दिवस गेले. तीन झाले, तीनाचे चार झाले. पण सापाला आपले देहभान राहिले नाही. तो तसाच बालकाभोवती वेटोळे घालून बसला. सरतेशेवटी बालकाच्या शरीराला दुर्गंधी येऊ लागली. नागाला जाणवले की, त्या बालकाचा आत्मा आता त्याच्या शरीरात नाही. मग तो नाग तेथून निघाला. त्याने अतिशय काकुळतीने देवाची करूणा भाकली, ‘‘हे देवा मी काय करू? मला राग आवरत नाही. कबूल. पण मी कोणाचे वाईट तर चिंतीत नाही. तू माझ्या तोंडात कसलं जालीम विष भरून ठेवलं आहेस? कुणाला स्पर्श करताच त्याचा जीव गेलाच. या देवस्वरूप बालकाचं थोडंतरी अकल्याण झालेलं मला



सहन होईल का? हे देवा, मला दिलेलं विष तू परत घे. हाय! हाय! क्रोधापासून मला आपला बचाव करता आला नाही, तर कमीत कमी दुसऱ्याचा जीव तर घेणार नाही ना? त्या पापापासून तरी मी वाचेन. पण तू तर माझ्या तोंडातच महाकालाची स्थापना केली आहेस. हे विष तू माझ्या तोंडातून काढून टाक."



दुसऱ्या दिवशी देवाने पाठविलेला एक गारूडी तेथून चालला होता. त्याच्या हातात झोळी होती. तो जंगलात येऊन पुंगी वाजवू लागला. नाग पुंगीच्या आवाजाने ओढला गेला. तसाच गारूड्यासमोर आला. फणा काढून मंत्रमुग्ध होऊन तेथे उभा राहिला. जस जसा गारुडी पुंगी वाजवीत होता, तसतसा नाग डोलत होता. ही अशी नागासमोर पुंगी वाजत राहिली, अन् नाग देहभान हरपून गारुड्यास



वश होत गेला. हळूहळू गारुड्याने प्रेमाने त्याला पुरे वश करून टाकले.

जेव्हा गारुड्याने त्याचे विषारी दात त्याच्या तोंडातून बाहेर काढले, तेव्हा नाग बेशुद्ध झाला. या असह्य वेदनेतही तो वारंवार गारुड्याचे आभार मानीत राहिला. कितीही दुःख, यातना, वेदना झाल्या तरी हा माणूस आपले विष बाहेर काढून टाकतोय यासाठीच तो आभार मानीत होता. शेवटी साप बेशुद्ध पडला. सापाला झोळीत टाकून गारुडी शहराकडे चालू लागला.

शुद्धीवर आल्यावर नागाला चोहोबाजूंनी काळोख दाटलेला दिसला. आपण चोहोंबाजूंनी बंदीत आहोत. कुठेही वाट नाही. शरीराला जोराचा रेटा देऊन त्याने कुणीकडून तरी मोकळी वाट धुंडायचा यत्न केला. पण चहूकडून आपटी खाऊन तो परत आला. सारे मार्ग खुंटल्याचे त्याला कळून चुकले. वर निळे निळे आकाश नाही तर त्यामागे तोच दाटलेला काळोख आहे. आपल्याला वेढणारी चीज चांगलीच मजबूत आहे हेही त्याला समजले. त्या वस्तूची आणि आपली कधीही जवळीक होणार नाही.

गारुडीबुवा आपली झोळी घेऊन शहरात कामासाठी निघाला.

तेथे पुंगी वाजवून सापांचा खेळ दाखवायचा आणि धान्य, पैसे आणि आपला भाकरतुकडा कमवायचा, असे त्याने ठरविले. पोरं



सापाचा खेळ पाहून आईला मागून भाकरी आणून देतील. सापाला पाहायची त्यांना मोठी उत्सुकता असेल, आवडही असेल. सापाची भीतीही वाटेल. पण गारुडी जवळ असतांना ती फार घाबरणार नाहीत. खडे-बिडे मारून ती सापाला डिवचतीलही. थोडे फार सापाला डिवचले तर काय बिघडते? सापाचा फणा पोरांना मोठा विचित्र वाटेल. चित्रातील सापाचा फणा पाहून त्यांना जेवढे नवल वाटते त्याहून खूपच अधिक नवल! तो खराखुरा फणा पाहून त्यांच्या मनाचे समाधान पण होईल. पण पोरांना कागदी सापाची भीती वाटत नाही. केवळ नवल वाटते. तसेच या सापाबाबतही वाटेल.

खेळ सुरू झाला आणि पेटाऱ्याचे झाकण उघडले गेले. सापाला आपल्या डोक्यावर उजेड पडलाय असे वाटले. तो आनंदाने फणा काढून वर सरसावला. समोर आपला उपकारकर्ता गारुडी पुंगी वाजवतांना दिसला. मग काय विचारता? तो साप फणा काढून डोलू लागला. गुंग होऊन पुंगीचे बोल ऐकता ऐकता आपल्या उपकारकर्त्यासमोर उभा राहिला.

नेमकी वेळ साधून गारुड्याने हाताने सापाला पेटाऱ्यातून काढले. मग बाहेर जमिनीवर सोडले. लोकांनी आपल्याला वेढून



टाकलेले सापाने पाहिले. त्याला लहान मुलेही दिसली—त्यांना काय पाहिजे आहे, हे त्याला कळेना. आपण एक चावरा हिंसक प्राणी आहोत. मग तरी ही मंडळी, खुशाल इतकी जवळ का उभी आहेत?

एकाएकी बाहेर जमिनीवर आल्यावर तो संकोचाने खाली आला. अंग चोरून तो लोकांच्या वेढ्यात पडून राहिला.

लोकांना सापाचे ते चमचमणारे मऊ शरीर खूपच आवडले.



अहो, एवढे मोठे अवजड धूड लोकांनी कधी पाहिले असेल का? जंगलाचा राजा असलेला एवढा भयंकर साप! तो असा अंगाची मुरकुंडी करून, तोंड लपवून पडलेला पाहून ते लोक खूप खूष झाले.

एकाने म्हटले, ''गारूडीबुवा, वर उचला पाहू त्याला.'' गारूडी म्हणाला, ''साहेब, हा नाग अजून नवा आहे, तो बुजतोय,'' एक मुलगा बोलला, ''याला चालवून दाखवा गारुडीबुवा.'' गारुडी म्हणाला, ''ठीक आहे बाबूजी.'' असे म्हणून त्याने सापाच्या शेपटीवर हाताने एक जोराचा वार केला.

पडल्या पडल्या साप किलकिल्या नजरेने आसपासच्या लोकांविषयी करूणेने विचार करीत होता. दोन पायांवर झाडासारखे उभे राहून चालणारे माणूस नावाचे जनावर त्याला जंगलात फार करून आढळले नव्हते. त्याला पाहून सुरुवातीलाच सापाला अतिशय भयही वाटले.

पण हा अतिशय दुबळा प्राणी आहे. आपण एक डंख मारला तर पाणी देखील मागणार नाही, हे कळले आणि त्याच्या मनातील भीतीची जागा करुणेने घेतली. ती विचित्र आणि अल्पजीवी माणसे चहूकडे जमलेली पाहून सापाला आधी भय वाटले. त्यांना एवढा अचंबा वाटावा, हे काही त्याला रुचले नाही. तरी पण त्यांची

आपुलकी त्याला आवडली. पण इतक्या माणसांच्या नजरांचे केन्द्र बनून असे शरीर आखडून राहणे त्याला बरे वाटेना. या परक्या माणसांमधून जंगलात पळून जावेसे त्याला वाटले होते. पण वाट कुठे दिसत होती?

त्याच वेळी शेपटीवर वार झाला. तसा तो फुत्कारला. त्याने फणा काढला. मग तो आपला फणा पसरवीतच सुटला. त्याने ताबडतोब वार करणाऱ्याकडे पाहिले. पण गारुडी पुंगी घेऊन वाजवीत होता. साप फणा पसरून उभा होता. त्या फण्यांच्या सुंदरतेवर लोकांची नजर खिळली. त्यांना वाटले, आता तर या-



सौंदर्यात केवळ आनंद आहे, भय नाही. आपला उभारलेला फणा चारही बाजूंनी फिरवून सापाने सारे काही टिपले. आपल्या मनात लोकांविषयी राग नाही, हे त्याला जाणवले. लोकांच्याही चेहऱ्यावर त्याच्याविषयी जणू आवडच दिसून येत होती. लहान मुलेही त्याला मुळीच घाबरली नाहीत हे सापाने रागाने पाहिले. तो रागारागाने



फुत्कारला. काळी विषारी लवलवणारी आपली जीभ बाहेर काढली. या हालचालींनी एखाददुसरा माणूस बिचकला असेल. पण लोकांना अधिकच रस आला. ते समाधानाने सापाच्या लीला पाहू लागले.



साप फणा कितीही रूंदावू शकत होता! तो फणा पसरवीतच गेला. त्या नागाचा फणा पारसनाथाच्या मूर्तीच्या (जैन धर्मातील तेविसावे तीर्थंकर) प्रभावळीतील नागफण्यासारखा दिसत होता. त्याचा फणा वर वर चढत चालला. शरीरातही जणू काही वीजेची लहर उसळली. सापाने आपल्या स्फुलिंगासारख्या नेत्रांनी चहूकडे नजर टाकली. पण लोकांची बेचैनी वाढतच चालली. भयाचा तर त्यांना वाराही शिवला नाही.



मग सापाने आपला फणा जोराने जमिनीवर आपटला. तशी जवळपासची धूळ उडाली. फण्याच्या टोकाखाली खड्डा पडला, तसा लोकांचा घेरासुद्धा मागे सरकला. सापाबाबतचे आकर्षण वाढले. पण भय मुळीच वाटले नाही.

त्यावेळी गारुड्याने बसल्या जागेवरून सापाला चुचकारले, ''बस बेटा, बस.'' त्याला आपला हात सापाच्या शरीरावरून फिरवावासा वाटला. साप त्वेषाने त्याच्या हातावर चालून गेला.

गारुड्याने ओठ पुढे करून परत चुचकारले. जसे काही त्याला त्याचे चुंबन घ्यायचे आहे.

सापाने आपला विफल राग आत दाबून ठेवला. तो खवळून उठला. त्याला जाणीव झाली की लोकांना आपली भीती वाटेनाशी झाली आहे. ते आपला उपहास करीत आहेत, आपले जे तेज होते ते या लोकांच्या नजरेत केवळ आपले रूप आहे. आपला राग त्यांचे मनोरंजन करतो. आपला अपमान त्यांना आनंद देतो.

गारूड्याने हलकेच त्याच्या शरीरावरून हात फिरवीत म्हटले, "ये बेटा, बस, बस बेटा."

सापाने जोराने दातांनी गारुड्याच्या हातावर आघात केला. आपल्या हातातून निघालेले रक्त पाहून गारुडी हसला. त्याने रक्त पुसले. शांतपणे सापाला चुचकारले, "असं रागावू नये बेटा, शाबास शाबास."

मग साप निमूटपणे वेटोळे करून जमिनीवर बसला. आपला फोलपणा त्याला सतावू लागला. आपला कलंकित अभिमान



चघळीत तो पराजित झाला. तोंड लपवून पडून राहिला. एकजण म्हणाला, "गारुडीबुवा, याचे विषारी दात उपटून टाकलेत वाटतं?"

गारूडी म्हणाला, "नाही दादा, याचा भरवसा करू नका बरं. आम्हा लोकांजवळ औषधी वनस्पती असतात," असे म्हणून त्याने सापाने दंश केलेल्या जागेवर कसला तरी पाला काढून चोळला. दुसऱ्या माणसाने विचारले, "अतिशय विषारी आहे वाटतं?"

गारुडी म्हणाला, "बाबूजी, याच्या दंशावर जगात काही इलाज नाही. फार भयंकर विषारी साप आहे हा."

साप शेपटीत तोंड लपवून पडला होता.

तिसऱ्या माणसाने फरमाईश केली, "गारुडीबुवा, हा तर निपचित बसलाय. याला परत उठवा पाहू."

गारुड्याने पुंगीच्या टोकाने त्या निपचित सापाच्या शेपटीला अनेक वेळा डिवचले. त्वेषाने साप थरथरू लागला. पण तो गुपचूप पडून राहिला. उठला नाही.

गारुड्याने परत एक वार करीत म्हटले, "उठ ना बेटा."

सापाला संतापाने आपल्यालाच कडकडून चावावेसे वाटत होते.

गारुड्याने परत त्याच्या फण्यावर वार केला. चुचकारीत म्हटले, “उठ बेटा.”

अन तो बेटा अखेर कुठवर उठला नसता बरं? सहन होईनासे झाले तसा तो उठला. उठून परत तसाच फणा पसरला. तसाच चारी दिशांना फणा फिरविला. तसेच फुत्कार सोडले. तशीच जीभ बाहेर काढली. तसेच शरीर आखडले. तसाच तो ताठरला. क्रोधाची तीच सगळी नक्कल केली. कारण तमासगिरांची हीच अपेक्षा होती. आणि तोच त्याचाही हट्ट होता.



लोकांना खूप मजा वाटली. सापाचा लोकांवर अनुकूल परिणाम झाला. हा खरेच भयंकर विषारी साप आहे हे लोकांना कळले. थोर पुरुषाचे दर्शन व्हावे पण थोरवीचा आपल्यावर काहीही प्रभाव पडू देऊ नये—अगदी असाच संतोष त्यांना वाटला. या संतोषाने सापाची थोरवी त्यांनी मानली.

सापाने सगळे काही करून दाखविले. आणि मग तो वेटोळे करून परत शेपटीत तोंड खुपसून तसाच पडून राहिला. तेवढ्यात एका दर्शकाला तो कसा चालतो ते अनावरपणे बघावेसे वाटले.



त्याला वाटले, ‘‘सापाला चालताना पाहून काय शान दिसते पाहू तर खरं.’’

गारुडी म्हणाला, ‘‘ठीक आहे बाबूजी.’’

आणि पुंगीने सापाला डिवचत त्याने म्हटले, ‘‘जरा चालून दाखव राजा, बाबूजींना खुश कर पाहू. तुला मोठं बक्षीस मिळेल.’’

मोठं बक्षीस मिळवायच्या इच्छेची गोष्ट कदाचित सापाला समजली नसावी, वार झेलीत तो जणू आग्रहपूर्वक निर्जीव वस्तूसारखा तेथे पडून राहिला. जरा वेळाने बाबूजींना खुश करण्याचा फायदा सापाला समजला असावा. त्याने आपले वेटोळे उलगडले. हळूहळू सरपटायला सुरुवात केली. गारुड्याने फण्याजवळ पुंगीने टोचत म्हटले, ‘‘बाबू लोकांना सलाम कर, सलाम कर बेटा.’’ सापाने फणा उभारला.

असे थोडे थोडे अंतर सरपटत साप परत तसाच अंग दुमडून घेत बसू लागला. गारुड्याने त्याला खूप शाबासकी दिली. त्याला दोन्ही हातांनी उचलून रिंगणात लोकांसमोर आणले. त्याला गरगर फिरवीत म्हटले :

‘‘दाता सबका भला करे!’’

# शेतकरी दादाची चूक

एकदा तांबडे फुटले. शेतकरी दादा बैल आणि नांगर घेऊन शेताकडे निघाला. बरोबर भाकरतुकडा घेतला. शेतावर पोचून



आपला नांगर जुंपला. भाकरी पंचात गुंडाळून एका झाडाखाली ठेवून दिली. मग तो कामाला लागला. दोन वाजेपावेतो काम करता करता बैल दमून गेले. त्याच्या पोटातही कावळे कावकाव करू लागले. त्याने बैलांना चरायला सोडले, नांगर एका बाजूला ठेवला.



भाकरीची शिदोरी सोडायला पंचा उचलला. पाहतो तर काय?

अरेच्या! भाकर गेली कुठे? पंचा उलट सुलट झटकला. पण भाकरी कुठं दिसेना. हे काय गौड बंगाल? शेतकऱ्याला काही समजेना.





त्याला नवल वाटले. मला दिसले नाही म्हणून काय झाले? कोणी ना कोणी येऊन भाकरी घेऊन गेले आहे, खचित.

खरे तेथे होता पापी दानवाचा सेवक. शेतकरी कामात असताना त्याने भाकरी पळवली होती. अजूनही तो तेथेच एका झाडामागे लपून बसला होता. त्याला वाटले, की तो शेतकरी आता रडेल,



बडबड करील. शिव्याशाप देईल. भाकरी नाहीशी झाली हे पाहून शेतकरी खंतावला. मग त्याच्या मनात आले, आता रडून काय होणार? अखेर भाकरी खाल्ली नाही तर आपण भुकेने मेलो तर नाही ना? शिवाय ज्याने भाकरी घेतली त्याला गरज असेल. जाऊ दे झालं–भलं होवो बापड्याचं, असा विचार करून तो विहिरीवर

गेला. पोटभर पाणी प्याला. अंमळ हात पाय मोकळे करायसाठी आडवा झाला. जरा डोळा लागला. परत मग आपले बैल घेऊन तो शेत नांगरू लागला.

हे पाहून सेवक मनोमन खजील झाला. त्याला वाटले होते की तो शेतकरी चिडून शिवीगाळ करील. पण त्याच्या तोंडून चकार बोल निघाला नाही.

मग त्याने आपल्या धन्याला त्या पाप–दानवाला ही बातमी दिली. त्याला सांगितले, ''मी शेतकऱ्याची भाकरी देखील पळविली. पण त्यानं शिवीगाळ केली नाही. उलट ज्यानं भाकरी घेतली असेल त्याचं भलं होवो असं म्हणाला.''

दैत्य हे ऐकून खूप रागावला. तो म्हणाला, ''एक मानवप्राणी तुझ्यावर मात करतो. याची शरम वाटायला हवी तुला. तुला आपलं काम मुळीच करता येत नाही. शेतकरी इतके प्रामाणिक झाले तर मग बघायलाच नको. दैत्य कुळाचं काय होणार? आमचा मोठेपणा कसा राहणार? ताबडतोब परत जा आणि मी सांगतो तसं कर. तीन वर्षात तू त्या शेतकऱ्याचा प्रामाणिकपणा कह्यात आणला पाहिजे. नाहीतर तुला वैतरणीत फेकून दिले जाईल. कळलं? जा आता. चालता हो.''

या धमकावणीने घाबरून तो सेवक धरणीवर परत आला. तो विचार करू लागला, काय करावं बरं? त्याने कर कर विचार केला. शेवटी त्याला एक युक्ती सुचली.



त्याने एका मजुराचा वेष धारण केला आणि त्या शेतकऱ्याकडे नोकरी धरली. पहिल्या वर्षी त्याने सांगितले की, यंदा दलदली जमिनीत पेर. शेतकऱ्याने देखील ऐकून तसेच केले. दैवयोगाने त्या साली खूप दुष्काळ पडला. सर्वांचे पीक उन्हाने पाण्याविना करपून गेले. पण शेतकरी दादाच्या शेतात अमाप पीक आले. कणसातील दाणाही मोठा टप्पोरा आला.

कापणी झाली. इतकं पीक झालं की यंदाची बेगमी तर झालीच. पण पुढील सालासाठीही कोठारे भरली.

पुढील साली सेवकाने सल्ला दिला—या वर्षी टेकाडाच्या जमिनीवर पेरलं पाहिजे. तिथेच पेरणी केली. अन् इतका पाऊस आला की बोलायची सोय नाही. इतरांचे पीक मोडले, सडले आणि कणसात दाणाच धरला नाही. पण या सेवकाच्या धन्याच्या, त्या शेतकऱ्याच्या टेकडीवरील शेतात कणसांची ताटे सळसळत राहिली. गुदस्तापेक्षाही अधिक धान्य उरले. कोठारे अगदी तुडूंब भरली. इतकी, की काय करावे हेच त्याला कळेना.

मग सेवकाने आपल्या धन्याला सुचविले की या धान्यांतून दारू तयार करता येईल, दारू अशी चीज आहे की काय सांगावे? तिची तुलना कशाशीही करता येणार नाही.



शेतकऱ्याने तेच केले. त्याने कडक दारू गाळली. आपण प्यायली, मित्रांना पाजली, एवढे केल्यावर तो सेवक आपल्या दैत्यस्वामीकडे आला. त्याने म्हटले, ‘‘धनी, मला यश मिळालं आहे. अन् आपलं काम पुरं झालं आहे.’’



दैत्य म्हणाला, ''बरं, तू काय केलं आहेस, हे मीच बरोबर येऊन पाहतो.'' दैत्य आणि त्याचा सेवक दोघे त्या शेतकऱ्याकडे आले. पाहतात तर काय, शेजारपाजारच्या धनिक शेतकऱ्यांनाही तेथे बोलावणे पाठवले आहे आणि मदिरेची मेजवानी चालली आहे. जणू काय एखादा सणच साजरा होतो आहे! शेतकऱ्याची बायको 'साकी' बनून पाहुण्यांना मदिरा देत आहे.

इतक्यात कोणाशीतरी टक्कर होऊन ती पत्नी अडखळली, आणि तिच्या हातून मदिरा सांडली. यावर तिच्या पतीने तोंड सोडले, ''साली, बेअकली कुठली. या दुर्मीळ पेयाला तू काय अशी तशी वस्तू समजलीस की काय. आपलं जाता येता सांड लवंड करीत हिंडत आहेस. नीच, बेशरम कुठली.''

सेवकाने हळूच कोपरखळी मारून आपल्या धन्याला दाखवले की, ''पहा, पहा. हाच तो माणूस. याच्या तोंडचा घास काढून घेतला तरीदेखील हा मुळीच रागावला नव्हता.'' शेतकऱ्याने आपल्या बायकोला बाजूला सारले. तरीदेखील तिच्यावर तणतणत तो प्याले भरभरून लोकांना देऊ लागला.

इतक्यात एक गरीब श्रमिक कामावरून परततांना तेथे आला. त्याला या मेजवानीसाठी बोलावले नव्हते. पण त्याने आपलं सर्वांना

''राम राम पाव्हनं'' करीत तेथेच बैठक मारली. बिचारा खूप दमला-भागला होता. सगळे दारू पितांना पाहून त्यालाही वाटले की मलाही एखादा घोट मिळावा. बिचारा बस बस बसला. तोंडाला पाणी सुटले होते. पण यजमान शेतकरी ढिम्म होता. त्याने त्याला



विचारलेही नाही. तो म्हणाला, असं दरएक आल्यागेल्या उपट सुंभाला मी कुठून आणू दारू? तुम्हीच सांगा.''

पापी दैत्य हे सर्व पाहून जाम खूष झाला. पण त्याच्या सेवकाने



सांगितले, "अजून काय झालं आहे, आता नुसते बघत राहा. कोण जाणे, अजून काय काय बाकी आहे."

घरातील, बाहेरचे, सगळ्यांनी चांगलाच हातभार लावला. पहिल्या फेरीत ते सगळे लोक आपापसात औपचारिक गोड गोड बोलू लागले. मैत्री–दोस्तीच्या गप्पा.

ते ऐकून दैत्य अगदी खुशालला. आणि सेवकाची पाठ थोपटू



लागला. तो म्हणाला, ''मदिरेमुळे कसा कोल्हयासारखा कपटीपणा संचारला आहे बघा मनात. ह्या पदार्थात जर लोकांनी एकमेकांशी फसवाफसवी करण्याचा गुण आहे तर मग आणखी काय पाहिजे? आपला विजय झालाच म्हणून समजा.'' सेवक म्हणाला, ''बघत राहा. आता तर ते कोल्ह्यासारखी एकमेकांपुढे शेपटी हलवीत आणि जाळं फेकीत राहिले आहेत. दारूचा एकेक प्याला त्यांना हिस्र क्रूर जंगली लांडगे बनवून सोडील की नाही पहा.''

मग सर्वांनी आणखी एकेक हप्ता चढवला. यानंतर त्यांचे संभाषण असभ्य वाटू लागले. आता ते एकमेकांना शिवीगाळ करू लागले. तोंडाची बडबड सुरू झाली आणि मारामारी पावेतो पाळी गेली. बघता बघता सारे जण आपसात तंटू लागले. यजमान देखील सामील झाले. त्यांची पार धुळधाण उडाली.

दैत्य या सर्व करामतीवर अगदी खुश झाला. त्याने सेवकाला सांगितले, ''हे तू अगदी छान केलं आहेस. मी तुझ्यावर अतिशय प्रसन्न झालो आहे.''

पण सेवक म्हणाला, ''अजून हा सीन बाकी आहे. पुढे यापेक्षाही फाकडा देखावा पाहाल. आता हे भुकेल्या लांडग्यासारखे लढू लागलेत. आणखी एक पेग चढविल्यानंतर तर डुक्कर बनतील डुक्कर!

मग तिसरा अंक सुरू झाला. आता डुक्कर आणि त्यांच्यात फरकच काय उरला होता? भान हरपून ते किंचाळत होते, आरडा ओरडा करीत होते. कोणी कोणाचे ऐकत नव्हते. त्यांना आवरणे कठीण झाले होते. ते एकमेकांच्या अंगावर पडत होते.



नंतर पांगापांग झाली. लोक लटपटत, पडत झडत, एक एक, करीत तेथून गल्ली बोळांतून निघून गेले. सेवकाचा धनी पाहुण्यांना निरोप देऊन बाहेर येतो न येतो तोच चिखलात उपडा पडला. चिखलात सगळे अंग बरबटून डुकराप्रमाणे तो तेथेच बडबड करीत पडून राहिला.

पापी दैत्य हे सर्व पाहून आपल्या सेवकावर खूप खुश झाला. तो म्हणाला, ''भले शाबास, तू खूप चांगली वस्तू शोधून काढलीस बरं. तुझी पहिली चूक तुला आता माफ. पण मला हे सांग, ही वस्तू तू तयार कशी केलीस? आधी तू यात कोल्हयाचं रक्त घातलं असावं. त्यामुळे कोल्ह्याचा कपटीपणा पिणाऱ्यांच्यात उतरला. मग त्यात लांडग्याचं दूध मिसळलंस वाटतं. तरीच ते लांडग्यासारखे हिंस्र नि क्रूर बनलेले दिसले. आणि सरते शेवटी डुकराचं रक्त देखील घातलं असलं पाहिजे. त्यामुळेच ते डुकरासारखे किंचाळू, गुरगुरू लागले.''

सेवक म्हणाला, ''छे, छे! याची गरजच पडली नाही. शेतकऱ्याजवळ गरजेपेक्षा अधिक पीक येईल, एवढंच मी केलं. पशूचं रक्त माणसात असतंच. पोटापुरतं अन्न त्याच्याकडं राहतं, तोवर त्याचा परिणाम दबला जातो. हेच शेतकऱ्याच्या बाबतीत झालं होतं. याआधी तोंडचा घास हिसकावून घेतला. तरीही तो चळला नाही.

पण त्याच्याकडे गरजेपेक्षा अधिक बेगमी झाली. साहजिकच चैन करावीशी वाटू लागली. बस, मग काय? मी केवळ त्याला चैनीची मार्ग दाखविला—दारू! देवाने दिलेल्या दुर्मीळ पदार्थांतून चैनीसाठी तो दारू तयार करू लागला. मग कोल्हा-लांडगा डुक्कर सर्वांचे गुण त्याच्यातून दिसू लागले. माणूस पीत राहिला तर खचित पशू बनेल.''



दैत्याने सेवकाला शाबासकी दिली. त्याची पहिली चूक माफ केली. आणि कर्तबगारी दाखविली म्हणून आपल्या चाकरीत त्याला वरचे पद बहाल केले.



